**वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना व यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजनेंतर्गत हाती घ्यावयाची कामे सुचविण्याकरीता बंजारा बहुल लातूर जिल्ह्यामध्ये समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : तांसुयो-२०२४/प्र.क्र.४४४/योजना-१**

नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-** १) शासन निर्णय, विमुक्त जाती भटक्या जमाती, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, क्रमांक तांसुयो-२०१७/प्र.क्र.८४/विजाभज-१, दिनांक ३०.०१.२०१८

२) शासन निर्णय, विमुक्त जाती भटक्या जमाती, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, क्रमांक तांसुयो-२०१७/ प्र.क्र.६०/विजाभज-१, दिनांक २४.०१.२०१८

३) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०२१/प्र.क्र.११/ विजाभज-१, दि.२३.०२.२०२१.

४) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०२१/प्र.क्र.११/ विजाभज-१, दि.२७.०९.२०२१.

५) प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, लातूर यांचे पत्र क्र.प्राउइमाबकलातूर/तांसु/२०२४-२५/१७९१ व १७९२, दिनांक २५.०७.२०२४ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात विमुक्त जाती भटक्या जमाती प्रवर्गात अनेक जाती, जमातीच्या तांडे, वाडी किंवा वस्त्या यांमध्ये सध्या या प्रवर्गातील समाज ज्या ठिकाणी वास्तव्यास आहे त्याच ठिकाणी स्थिर जीवन जगता यावे याकरीता त्यांना काही अत्यावश्यक पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेच्या अंमलबजावणीसाठी वाचा येथील क्र.१ च्या शासन निर्णयान्वये सविस्तर सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. तसेच विमुक्त जाती भटक्या जमाती प्रवर्गातील लोकांना सामुहिक अथवा वैयक्तिक स्वरुपात घरकुलांचा लाभ देण्यासाठी वाचा येथील क्र.२ अन्वये यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना राबविण्यात येते. सदरहू योजनांच्या अनुषंगाने हाती घ्यावयाची कामे संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीने निवड करुन शासनास सादर केली जातात. अशा कामांना शासनस्तरावरुन प्रशासकीय तसेच कार्योत्तर मान्यता व निधी उपलब्ध करुन दिला जातो. सदरहू योजनांतर्गत हाती घ्यावयाच्या कामांना प्राधान्य देण्याबाबत वाचा येथील क्र. ३ अन्वये संबंधित तालुक्यातील लोकप्रतिनिधींच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात

आली आहे. त्याचप्रमाणे सदरहू योजना अधिक प्रभावीपणे राबविण्याकरीता वाचा येथील क्र. ४ अन्वये बंजारा बहुल ११ जिल्ह्यांमध्ये वसंतराव नाईक तांडा/ वस्ती योजना व यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजनेंतर्गत हाती घ्यावयाची कामे संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीस सुचविण्याकरीता बंजारा समाजातील व्यक्तीच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने बंजारा बहुल लातूर जिल्ह्यासाठी स्थापन करावयाच्या समितीवर अध्यक्ष व सदस्य यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना व यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना या योजनांतर्गत हाती घ्यावयाची कामे जिल्हाधिकारी, लातूर यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीस सुचविण्याकरीता बंजारा बहुल लातूर जिल्ह्यासाठी स्थापन करावयाच्या समितीच्या अध्यक्षपदी “श्री.सुरेश मारुती राठोड” तसेच सदरहू समितीमधील विमुक्त जाती प्रवर्गासाठी राखीव असलेल्या सदस्यपदी “ श्री.महेश रुपचंद चव्हाण”यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सदर मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१) वसंतराव नाईक तांडा/वस्ती योजना व यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजनेंतर्गत हाती घ्यावयाची कामे जिल्हाधिकारी, लातूर यांच्या अध्यक्षतेखालील समितीस कामे सुचवितांना सदरहू योजनांच्या सर्व तरतुदींची पुर्तता होईल याची दक्षता घ्यावी.

२) योजनांतर्गत हाती घ्यावयाची कामे यापुर्वी अन्य योजनेतून मंजूर झालेली नाहीत अथवा अशा कामांना अन्य कोणत्याही योजनेतून निधी मिळालेला नाही याची खातरजमा करावी.

३) तांडे, वाडी किंवा वस्त्या यांचा समतोल विकास होण्याच्या दृष्टीने स्थानिक परिस्थितीनुसार कामांचा प्राधान्यक्रम व निकड विचारात घेऊन कामे सुचवितांना ती एकाच विशिष्ट प्रकारची नसावीत. तसेच निवड करावयाच्या कामांसंदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचे उल्लंघन होणार नाही याची दक्षता घ्यावी.

४) समितीच्या अनुषंगाने केलेल्या कामाबद्दल मानधन/अनुदान/प्रवासभत्ता इ. कोणतेही आर्थिक लाभ अनुज्ञेय असणार नाहीत.

५) सदरहू नियुक्ती शासनाच्या पुढील आदेशापर्यंत राहील.

३. समितीमधील भटक्या जमाती प्रवर्ग आणि विमुक्त जाती / भटक्या जमाती प्रवर्गातील महिला सदस्य यांसाठी राखीव असलेल्या २ सदस्यांच्या नियुक्तीसंदर्भात स्वतंत्ररित्या आदेश निर्गमित करण्यात येतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२६१८१५४५६१३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH VAMAN SARANG

Digitally signed by MAHESH VAMAN SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=d0fd8a6eb797ea40ee23585844bb6560f906ef81c281595276444d546ca36145, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F69F7D02E8869F5B3A4C2B8A9895589FF307B9C66DE751750FC9831B49A017C0, cn=MAHESH VAMAN SARANG
Date: 2024.08.26 18:31:01 +05'30'

(म. वा. सारंग)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजना / यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना, लातूर.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
५) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
६) प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग (प्रादेशिक), लातूर.
७) तहसिलदार, लातूर (सर्व तालुके).
८) गट विकास अधिकारी, लातूर (सर्व तालुके).
९) सहायक संचालक,इतर मागास बहुजन कल्याण, लातूर
१०) जिल्हा समाजकल्याण अधिकारी, लातूर.
११) सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) श्री.सुरेश मारुती राठोड, रा.कन्हेरी तांडा, ता., जि.लातूर
१३) श्री.महेश रुपचंद चव्हाण, रा.एकंबी तांडा, ता.औसा, जि.लातूर
१४) निवडनस्ती (योजना-१).